**राज्य शासकीय व इतर पात्र कर्मचा-यांना महागाई भत्ता वाढीची थकबाकी देणेबाबत.**

महाराष्ट्र शासन
वित्त विभाग
शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक: मभवा-११०२/प्र.क्र.२२/सेवा-९
मंत्रालय, मुंबई ४०००३२.
दिनांक १६ ऑक्टोबर, २००३

पहाः- (१) शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक मभवा-११८८/२१/सेवा-१०, दिनांक ३ मार्च ,१९८८.
(२) शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक मभवा-११००/प्र.क्र.३३/सेवा-९, दिनांक १२ ऑक्टोबर, २००१
(३) शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक मभवा-११०२/प्र.क्र.६/सेवा-९, दिनांक १५ मे, २००२
(४) शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक मभवा-११०२/प्र.क्र.२२/सेवा-९, दिनांक १४ ऑगस्ट, २००३

## शासन निर्णय

राज्य शासकीय कर्मचारी व इतर पात्र कर्मचा-यांना वरील अनुक्रमांक ४ येथील शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक मभवा-११०२/प्र.क्र.२२/सेवा-९, दिनांक १४ ऑगस्ट २००३ अन्वये दिनांक १ ऑगस्ट २००३ पासून केंद्र शासनाच्या सुत्रानुसार, दरमहा मूळ वेतनाच्या ५५ टक्के दराने महागाई भत्ता मंजूर करण्यात आला आहे. राज्य शासकीय कर्मचारी व इतर पात्र कर्मचा-यांना दिनांक १ ऑगस्ट २००३ पूर्वीची महागाई भत्त्यातील थकबाकी मंजूर करण्याचा प्रश्न शासनाच्या विचाराधीन होता. याबाबत शासन आता असे आदेश देत आहे की, महागाई भत्ता अनुज्ञेय आहे अशा सर्व पूर्णकालिक कर्मचा-यांना खालील तक्त्यात दर्शविलेल्या सुधारित दराने महागाई भत्ता मंजूर करण्यात यावा.

| अ.क्र. | महागाई भत्ता अनुज्ञेय होण्याचा दिनांक | दरमहा महागाई भत्त्याचा दर (टक्के) | |
|---|---|---|---|
| | | विद्यमान | सुधारित दर |
| १ | १-१-२००२ | ४१.५ | ४३.५ |
| २ | १-४-२००२ | ४४.५ | ४६.२५ |
| ३ | १-७-२००२ | ४४.५ | ४८.५ |
| ४ | १-१-२००३ | ४४.५ | ५०.७५ |
| ५ | १-४-२००३ | ४४.५ | ५५ |

२. वरील सुधारित दराप्रमाणे दिनांक १ जानेवारी २००२ पासून दिनांक ३१ जुलै २००३ पर्यंतच्या कालावधीतील महागाई भत्ता वाढीची रक्कम, यापूर्वी, वरील अनुक्रमांक २ व ३ येथील अनुक्रमे शासन निर्णय, वित्त विभाग दिनांक १२ ऑक्टोबर २००१ व शासन निर्णय, वित्त विभाग, दिनांक १५ मे २००२ अन्वये दिनांक १ ऑक्टोबर २००१ व दिनांक १ एप्रिल २००२ पासून अनुक्रमे ४१.५ टक्के व ४४.५ टक्के दराने मंजूर करण्यात आलेल्या महागाई भत्त्याच्या रकमा त्या शासन निर्णयातील अटींच्या अधीन वरील परिच्छेद १ मध्ये मंजूर करण्यात आलेल्या सुधारित महागाई भत्ता वाढीच्या परिणामी देय ठरणा-या रकमांशी समायोजित करुन, संबंधित कर्मचा-यांच्या भविष्य निर्वाह निधी खात्यात वर अनुक्रमांक १ येथील शासन निर्णय, वित्त विभाग, दिनांक ३ मार्च १९८८ च्या परिच्छेद ६ मध्ये नमूद केलेल्या पध्दतीनुसार जमा करण्यात यावी. ज्या कर्मचा-यांच्या नांवे भविष्य निर्वाह निधी खाते उघडण्यात आले नसेल अशा कर्मचा-यांच्या बाबतीत त्यांच्या नांवे भविष्य निर्वाह निधी खाते उघडण्यात येईल त्यावेळी थकबाकीची रक्कम काढून त्यांच्या भविष्य निर्वाह निधी खात्यात जमा करण्यात यावी. तसेच भविष्य निर्वाह निधी खात्यात जमा होणा-या सदरहू रकमेतून **दिनांक ३१ डिसेंबर २००६ पर्यंत अग्रिम मंजूर करण्यात येऊ नये.**

२.२ ज्या कर्मचा-यांना अंशदानात्मक भविष्य निर्वाह निधी योजना लागू आहे अशा कर्मचा-यांच्या बाबतीत अतिरिक्त महागाई भत्त्याच्या अंशदानात्मक भविष्य निर्वाह निधी खात्यात जमा करण्यात येणा-या रकमेच्या अनुषंगाने शासनाकडून कोणतेही अनुरुप अनुदान दिले जाणार नाही.

२.३ वरील परिच्छेद २ व २.२ अनुसार भविष्य निर्वाह निधी खात्यात जमा केलेल्या थकबाकीच्या रकमांचा हिशेब भविष्य निर्वाह निधी खात्यातील नियमित वर्गणीच्या हिशेबांहून वेगळा दर्शविण्यात यावा व त्यावर दिनांक १ नोव्हेंबर २००३ पासून व्याज अनुज्ञेय करण्यात यावे. मग प्रत्यक्ष जमेची तारीख कोणतीही असो.

३. महागाई भत्त्याची रक्कम प्रदान करण्यासंदर्भात विद्यमान तरतुदी व कार्यपध्दती आहे तशाच यापुढेही लागू राहतील.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

**शुभदा कारेकर**
**उप सचिव, वित्त विभाग**

प्रधान महालेखापाल-१ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई
महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई
महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, नागपूर
महालेखापाल-२ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, नागपूर
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
राज्यपालांचे सचिव
मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव
उप मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव
सर्व मंत्री आणि राज्यमंत्री यांचे स्वीय सहायक
मंत्रालयीन सर्व विभाग
सर्व विभागीय आयुक्त
मंत्रालयाच्या सर्व विभागाखालील विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख
# प्रबंधक, उच्च न्यायालय (मूळ शाखा), मुंबई
# प्रबंधक, उच्च न्यायालय (अपील शाखा), मुंबई
# सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई
# सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
# प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई
# सहसंचालक, ऑल इंडिया इन्स्टिटयूट ऑफ लोकल सेल्फ-गव्हर्नमेंट, मुंबई
उच्च व तंत्र शिक्षण व सेवायोजन विभाग, मंत्रालय, मुंबई (२० प्रती)
शालेय शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई (२० प्रती)
ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई (२० प्रती)
नगर विकास विभाग, यूडी-१०, मंत्रालय, मुंबई (२० प्रती)
कृषि व पदुम विभाग (२० प्रती)
सहकार व वस्त्रोद्योग विभाग (२० प्रती)
आदिवासी विकास विभाग (२० प्रती)
सिनियर रिसर्च ऑफीसर, पे रिसर्च युनिट, भारत सरकार, वित्त मंत्रालय (व्यय विभाग), खोली क्र.२६१, नॉर्थ ब्लॉक, नवी दिल्ली
संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी हिशेब, मुंबई
उप मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी हिशेब, मुंबई/पुणे/नागपूर/औरंगाबाद/नाशिक/अमरावती
सर्व जिल्हा परिषदाचे शिक्षणाधिकारी
सर्व विभागीय शिक्षण उप संचालक (प्रत्येकी १० प्रती)
सर्व विभागीय तंत्र शिक्षण उप संचालक (प्रत्येकी १० प्रती)
आयुक्त, महानगरपालिका, नागपूर
प्रशासकीय अधिकारी, पश्चिम महाराष्ट्रातील नगरपालिका शिक्षण मंडळे (पुणे/कोल्हापूर/सोलापूर या महानगरपालिकांची शिक्षण मंडळे यासह)
मुख्य अधिकारी, सर्व नगरपालिका
कार्यकारी अधिकारी, कॅन्टोनमेंट बोर्ड, खडकी/देहू रोड/देवळाली/अहमदनगर
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
संचालक, आदिवासी कल्याण, महाराष्ट्र राज्य, नाशिक (१० प्रती)
संचालक, समाज कल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे (१० प्रती)
संचालक, आदिवासी संशोधन व शिक्षण संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे
आदिवासी विकास आयुक्त, नाशिक
सर्व विभागीय समाज कल्याण अधिकारी
अपर आयुक्त, आदिवासी उपयोजना, नाशिक/नागपूर
सर्व समाज कल्याण अधिकारी, वर्ग-१
सर्व आदिवासी कल्याण अधिकारी
सर्व प्रकल्प अधिकारी, एकात्मिकृत आदिवासी विकास प्रकल्प
कुलसचिव, महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहूरी, जिल्हा अहमदनगर
कुलसचिव, मराठवाडा कृषि विद्यापीठ, परभणी
कुलसचिव, पंजाबराव कृषि विद्यापीठ, अकोला
कुलसचिव, कोकण कृषि विद्यापीठ, दापोली, जिल्हा रत्नागिरी
कुलसचिव, मुंबई विद्यापीठ, मुंबई
कुलसचिव, पुणे विद्यापीठ, पुणे
कुलसचिव, नागपूर विद्यापीठ, नागपूर
कुलसचिव, डॉ.बाबासाहेब आंबेडकर मराठवाडा विद्यापीठ, औरंगाबाद
कुलसचिव, शिवाजी विद्यापीठ, कोल्हापूर
कुलसचिव, अमरावती विद्यापीठ, अमरावती
कुलसचिव, श्रीमती नाथाबाई दामोदर ठाकरसी महिला विद्यापीठ, मुंबई
अधिक्षक, वेतन पथक, सर्व जिल्हे
शिक्षण निरीक्षक, बृहन्मुंबई (उत्तर, दक्षिण व पश्चिम विभाग)